अनैतिक मानवी वाहतुकीस प्रतिबंध करण्यासाठी
राज्याचा कृती आराखडा-२०१६.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-२०१३/प्र.क्र.२२४/का-०३**
नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- १५ मार्च, २०१७.

वाचा :-

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र. पीपीए ०६०४/एमएच५९/प्र.क्र.९०/विशा-६,-२०११, दि. २३/०२/२००५
२) शासन शुध्दीपत्रक, गृह विभाग क्र. पीपीए ०६०४/एमएच५९/प्र.क्र.९०/विशा-६,-२०११, दि. १८/०७/२००५
३) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्रमांक आयटीपीए-२००५/प्र.क्र.२६४/का-३, दिनांक २०/०९/२००६
४) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्रमांक एसपीए-२००७/प्र.क्र.३९/का-३, दिनांक ०१/०२/२००८.

**प्रस्तावना:-**

महिला व बालकांच्या होणा-या अनैतिक मानवी वाहतूकीस प्रतिबंध करणेसाठी महाराष्ट्र शासन गेल्या अनेक वर्षापासून परिणामकारक पाऊले उचलत आहे. राज्यात मानवी व्यापार रोखण्याची प्रणाली विकसित करून यंत्रणा मजबूत करताना बालकांची काळजी व संरक्षणासाठी २००० मध्ये बनविलेला व २००६ मध्ये सुधारणा केलेला आणि नव्याने आस्तित्वात आलेला बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम २०१५ आणि अनैतिक व्यापार प्रतिबंधक अधिनियम १९५६ या अंतर्गत महिला व बालकांचे हित जपण्याचे प्रयत्न करण्यात आले आहेत.

राज्यात अनैतिक मानवी व्यापारास प्रतिबंध करण्यासाठी " कृती आराखडा २००७" तयार करण्यात आला होता. सदर कृती आराखडा जाहीर होऊन ८ वर्षाहून अधिक कालावधी झालेला आहे. तसेच माहिती तंत्रज्ञानातील नवनवीन सुविधांचा वापर मानवी व्यापाराच्या व्यवसायात होत असल्यामुळे या गुन्ह्यातील वाढलेली गुंतागुंत आणि त्याला सामोरे जाण्याचे मार्ग अशी नवी आव्हाने निर्माण झाली आहेत. या पार्श्वभूमीवर महाराष्ट्रातील मानवी वाहतूकीस प्रतिबंध करण्यासाठी तंत्र विकसित करण्याचे व यंत्रणा बळकट करण्याचे शासनाने ठरविले आहे. त्यानुसार महाराष्ट्रात अनैतिक मानवी व्यापारास प्रतिबंध करण्याकरिता नव्याने राज्य कृती आराखडा तयार करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

आता या शासन निर्णयान्वये अनैतिक मानवी वाहतूक रोखण्यासाठी सोबत जोडलेल्या राज्य कृती आराखडा,२०१६ यास शासन मान्यता देत आहे.

१) कृती आराखड्यानुसार अनैतिक मानवी वाहतूक रोखण्यासाठी शासन प्रतिबंध, सुटका, पुनर्वसन, मायदेशी परत पाठवणे, सामावून घेणे, खटला चालविणे, माहितीची साठवण व समन्वय या बाबींवर लक्ष केंद्रित करेल.

२) अंमलबजावणी:-

सोबत जोडलेल्या कृती आराखड्यात प्रत्येक कृतीपुढे नमूद केल्यानुसार त्या-त्या यंत्रणेची अंमलबजावणीबाबत जबाबदारी राहील.

३) संनियंत्रण:-

शासन निर्णय, गृह विभाग क्र. पीपीए ०६०४/एमएच५९/प्र.क्र.९०/विशा-६,-२०११, दि. २३/०२/२००५ अन्वये स्थापन करण्यात आलेली व शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्रमांक एसपीए-२००७/प्र.क्र.३९/का-३, दिनांक ०१/०२/२००८ अन्वये विस्तारित करण्यात आलेली राज्य सल्लागार समिती राज्य कृती आराखड्याची शहानिशा करील व प्रगतीचा आढावा घेईल.

४) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्रमांक आयटीपीए-२००५/प्र.क्र.२६४/का-३, दिनांक २०/०९/२००६ अन्वये पोलिस अधिक्षक/पोलिस उपायुक्त यांचे अध्यक्षतेखाली स्थापन केलेली जिल्हास्तरीय समिती जिल्हा पातळीवर कृती आराखड्याची अंमलबजावणी करेल तसेच, सदर समितीमध्ये विशेष आमंत्रितांना बैठकीसाठी बोलविण्याची तरतूद राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३१५११४८२२३३३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2017.03.16 11:22:06 +05'30'

**( स्मिता निवतकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई-३२
२. मा.मंत्री,महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
३. मा.राज्यमंत्री,महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
४. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई-३२
५. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
६. पोलिस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे.
८. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई.
९. पोलिस आयुक्त,मुंबई
१०. संचालक, आरोग्य सेवा
११. संचालक, उच्च व तंत्र शिक्षण
१२. सचिव, महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग, वरळी, मुंबई.
१३. सचिव, महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई.
१४. सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई.
१५. पोलिस महानिरीक्षक, महिला अत्याचार प्रतिबंध विभाग
१६. युनिसेफ,मुंबई
१७. प्रयास,प्रेरणा,स्त्री आधार केंद्र,रेस्क्यू फाउंडेशन या स्वयंसेवी संस्था
१८. सर्व उप सचिव, अवर सचिव, कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. सर्व जिल्हाधिकारी
२०. सर्व विभागीय उपायुक्त महिला व बाल विकास विभाग.
२१. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
२२. निवड नस्ती / का-३.